**अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहित नसलेल्या शासकीय कर्मचारी/ निवृत्तीवेतनधारक यांच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तीवेतन व सेवा उपदान मंजूर करणेबाबत....**

**बेपत्ता श्री.भिमाशंकर बाबुराव जंगम, स्वेच्छा सेवानिवृत्त पो.शि. क्र. १८५५**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कुनिवे-०११५/प्र.क्र.५/आस्था-१**

मादाम कामा रोड, नवीन प्रशासकीय भवन, १२ वा मजला

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ जून, २०१५.

वाचा :-१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : सेनिवे-१०३९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१.

२) अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस, नायगांव, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्र. ९०६५/ अपोआ/सपो/निवेशा/२०१४, दि. १८.११.२०१४ व क्र. २९४६/अपोआ/सपो/निवेशा/२०१५, दि. २४.०३.२०१५.

प्रस्तावना :

श्री. भिमाशंकर बाबुराव जंगम, स्वेच्छा सेवानिवृत्त पो.शि. क्र. १८५५ हे अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस, नायगांव, मुंबई यांचे आस्थापनेवर कार्यरत होते. ते दि. ४.०८.२०१० (म.नं.) पासून स्वेच्छा सेवानिवृत्त झाले आहेत. श्री. जंगम हे दि. ५.०५.२०१३ पासून बेपत्ता झाल्याची खबर नालासोपारा पोलीस स्टेशन येथे प्रथम खबरी अहवाल दाखल केलेला आहे. त्यांची नोंद मिसिंग रजिस्टर नंबर १८३/२०१३ वर आहे. श्री. भिमाशंकर बाबुराव जंगम यांच्या मिसिंग बाबतचा तपास चालू असल्याबाबतचा दाखला ठाणे अंमलदार, नालासोपारा पोलीस स्टेशन यांनी दि. २३.०२.२०१५ रोजी दिलेला आहे.

२. श्री. भिमाशंकर बाबुराव जंगम हे बेपत्ता झाल्याने त्यांच्या पत्नी श्रीमती छाया भिमाशंकर जंगम यांनी त्यांचे नामनिर्देशन असल्याने त्यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याची विनंती अपर पोलीस आयुक्त,सशस्त्र पोलीस, नायगांव, मुंबई यांनी केली आहे. सदर प्रस्तावासोबत क्षतीपूर्ती बंधपत्र, प्रथम खबरी अहवाल व पोलीस स्टेशनचा अहवाल इ. कागपत्रे दाखल केली आहेत. श्रीमती छाया भिमाशंकर जंगम यांच्या कुटुंब निवृत्तीवेतनाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** :

श्री. भिमाशंकर बाबुराव जंगम हे बेपत्ता झाल्याने त्यांच्या पत्नी श्रीमती छाया भिमाशंकर जंगम यांचे नामनिर्देशन असल्याने त्यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याची विनंती अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल , नायगांव, मुंबई यांनी केली आहे. श्री. जंगम हे बेपत्ता होवुन १ वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला असल्याने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदीस अनुसरुन बेपत्ता श्री. भिमाशंकर बाबुराव जंगम, स्वेच्छा सेवानिवृत्त पो.शि.क्र. १८५५ यांच्या पत्नी श्रीमती छाया भिमाशंकर जंगम यांना कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे. तथापि, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१ अन्वये क्षतिपूर्ती बंधपत्र परिपूर्ण करुन व आवश्यक बाबींची पूर्तता करुन घेण्याची खबरदारी अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस, नायगांव,मुंबई यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ७.१०.१९९३, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०९४/१५६/सेवा-४, दि. २६.०६.१९९५, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०००/प्र.क्र. ८३/सेवा-४, दि. ३.०७.२००० यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१५०६२३१५५८१४७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yuvraj Bayaji Ajetrao
Date: 2015.06.23 15:59:46 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१ पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२ पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

३ अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल , नायगांव, मुंबई.

४ बेपत्ता श्री.भिमाशंकर बाबुराव जंगम यांचे पत्नीस अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल , नायगांव, मुंबई यांचे कार्यालयामार्फत.

५ महालेखापाल ( लेखा व हकदारी), महाराष्ट्र,१/२, मुंबई/नागपूर.

६ अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

७ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८ निवड नस्ती ( आस्था-१ ).